**नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. भोकर ता.भोकर जि.नांदेड.**
**(सन- २०१९-२०)**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. गोदाबां-१०१८/प्र.क्र.११७ (भाग-१)/नापु-१६-ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०२ मार्च, २०२०.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अन्नधान्याच्या साठवणूकीसाठी भोकर ता. भोकर जि. नांदेड येथील १८०० मे.टन क्षमतेचा गोदाम बांधकाम प्रस्ताव जिल्हा पुरवठा अधिकारी, नांदेड यांचेकडून शासनास प्राप्त झाला आहे. सदर गोदामाच्या अंदाजपत्रकास व बांधकामास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन परिपत्रक दि.२५.०९.२०१९ नुसार मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी दिलेल्या तांत्रिक सहमतीच्या अनुषंगाने शासकीय गोदाम बांधणीच्या अंदाजपत्रकास व कामास नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत हाती घेण्यात आलेल्या प्रकल्पातंर्गत प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

२. भोकर ता. भोकर जि.नांदेड येथील १८०० मे.टन क्षमतेच्या गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकास व कामास पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर कामाचे अंदाजपत्रक सन २०१८-१९ च्या दरसूचीवर आधारित आहेत. सदर अंदाजपत्रकावर विभागाच्या वतीने जिल्हा पुरवठा अधिकारी, नांदेड यांनी साक्षांकन केले आहे.
II. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.
III. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
IV. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

३. **शासकीय गोदाम बांधकाम:-**

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | प्रस्तावित गोदामाचे ठिकाण | गोदाम संख्या | प्रस्तावित गोदामाची क्षमता (मे.टन.) | प्रस्तावित गोदामाची अंदाजपत्रकीय किंमत (रू.) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | नांदेड | भोकर | भोकर | १ | १८०० | **३,६६,७५,८९४/-** |

४. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या नवीन शासकीय गोदाम बांधकामासाठी निधी प्राप्त झाल्यांनतर शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने सुरू करण्यात येऊन विहित मुदतीत पूर्ण करण्यात यावीत.

५. सदरील शासकीय गोदाम बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी, नांदेड यांनी घ्यावी.

६. सदर गोदाम बांधकामावरील खर्च सन २०१९-२० या वित्तीय वर्षात व तद्नंतर वेळोवेळी उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात येईल.

७. उपरोक्त खर्च “मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८,०२, साठवण व वखार साठवण,१०१, ग्रामीण भागात गोदाम बांधणे कार्य़क्रम (०१) नविन गोदामाचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम करणे (मुफसल) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे”या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

८. बांधकामासाठी विलंब अथवा इतर कारणाने वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर गोदामांचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. सदर गोदाम बांधकामांच्या कामांना आवश्यकतेनुसार निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

९. सदर गोदामांचे बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

१०. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यांनंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरिक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

११. काम सुरू करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घेण्यात यावी.

१२. गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकातील मुख्य गोदाम बांधकामाव्यतिरिक्त इतर सोयी सुविधांच्या समावेशाबाबत शासन स्तरावरुन दिलेल्या विविध सुचना विचारात घेवून जिल्हाधिकारी यांच्या स्तरावर खातरजमा करुन वजन काटे कार्यालये, प्रसाधन गृहे, इ. सोयींचा आवश्यकतेनुसार अंतर्भाव करावा.

१३. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग-१, उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. सदर प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी दिलेल्या तांत्रिक सहमतीनुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०२१४५२१८८१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip Girdhar Chavan

Digitally signed by Pradip Girdhar Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food, Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ad1667fce35440d37e8567cc278d78039b81154909a1162e319e905bd4e93b, serialNumber=f7e9a44534c5a6e0d2062d6f59ec690169fc00c18def69311f356364b1870337, cn=Pradip Girdhar Chavan
Date: 2020.03.02 14:57:21 +05'30'

**( प्र.गि.चव्हाण )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी, नांदेड.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बाधंकाम प्रादेशिक विभाग, मुंबई व औरंगाबाद.
३. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग,मुंबई.
४. उपायुक्त (पुरवठा) , औरंगाबाद.

५. जिल्हा पुरवठा अधिकारी, नांदेड.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग, नांदेड.
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उप सचिव मार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-१०, अर्थोपाय, अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय,मुंबई.
१२. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय,मुंबई
१३. उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर पुणे ४११००५
१४. निवड नस्ती/नापु-१६-ब.